**पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या योजनेस सन २०२०-२१ या वर्षाकरीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयसीएस -२०२०/प्र.क्र.१७७ /११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १५ जून, २०२०

**वाचा -**

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०२०/प्र.क्र.१३३/११-अे, दि.२७.०२.२०२०
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ -३ , दि.१६.०४.२०१९
३. भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र NO.G.२००११ /१/ २०२०-EA, दि.२६.०५.२०२०
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र सां.-४/आयसीएस/१३३४०, दि.२८.०५.२०२०

**प्रस्तावना -**

पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना ही योजना सन २०२०-२१ मध्ये महाराष्ट्र राज्यात रु.१२५.०० लाख इतक्या निधीच्या मर्यादेत राबविण्यास संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने प्रशासकीय मान्यता दिलेली आहे.

२. पिकांचे आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेतील २२ अस्थायी पदे दिनांक १ मार्च, २०२० ते ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

३. पिकांचे आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेस केंद्र शासनाने दिलेल्या प्रशासकिय मान्यतेच्या मर्यादेत व राज्य शासनाच्या श्वेतपुस्तिकेप्रमाणे (White book) सन २०२०-२१ मध्ये मंजूर केलेल्या तरतूदीनुसार राज्य शासनाची बाबनिहाय प्रशासकीय मान्यता देण्याकरिताचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने उपरोक्त दि.२७.०५.२०२० च्या पत्रान्वये सादर केलेला आहे. त्या अनुषंगाने उपरोक्त योजनेला सन २०२०-२१ या वर्षाकरीता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिकांचे आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यात राबविण्यास व सदर योजनेंतर्गत सन २०२०-२१ साठी पुढील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार रु.१२५.०० लाख इतक्या रकमेचा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम रुपये लाखात)

| अ.क्र. | बाब | सन २०२०-२१ अर्थसंकल्पित तरतूद | सन २०२०-२१ साठी केंद्र शासनाने दिलेली प्रशासकीय मान्यता |
|---|---|---|---|
| १ | ०१-वेतन | २४३.०० | १२५.०० |
| २ | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | ०२.०० | |
| ३ | १३-कार्यालयीन खर्च | ०५.०० | |
| | **एकूण** | **२५०.००** | **१२५.००** |

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**"मागणी क्रमांक डी-३, २४०१, पीक संवर्धन,**
**(००) (१११) कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**(००) (११) पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याची योजना,**
**(१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ २५७८)"**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि )यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांचे अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. १४२/१४३१, दि.१०.६.२०२० व क्र.४६/व्यय-१,दि.११.६.२०२० च्या अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२००६१५१७४२४०७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.06.16 12:34:17 +05'30'

**(सु. सं. धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३. उप सचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
७. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
८. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११.वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२.नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३.कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३
१४.निवड नस्ती, का.११-अे.